**मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी तिस-या तिमाही (Quarter-3) हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३११६/प्र.क्र.७७/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ सप्टेंबर, २०१८.

वाचा -

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.१.२०१२.
३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.
४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.४.२०१५
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७
७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.
८) गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.
९) प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दिनांक ३०.०६.२०१८ रोजीचे पत्र व त्यासोबत सादर केलेली तिस-या तिमाहीची देयके.
१०) प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दिनांक ०७.०७.२०१८ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.
११) पोलीस आयुक्त, मुंबई शहर यांचे दिनांक २३.०७.२०१८ रोजीचे पत्र.
१२) प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दिनांक २४.०७.२०१८ रोजीचे पत्र
१३) प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दिनांक २७.०७.२०१८ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.

प्रस्तावना-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु.९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१४ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

गृह विभाग, शासन निर्णय दि.२७.०७.२०११ अन्वये उच्चस्तरीय शक्तीप्रदान समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या दि.१०.०५.२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली असून

ती एकूण रु.९९६ कोटी एवढी निश्चित करण्यात आली आहे. यापूर्वी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे काम शहराच्या क्षेत्रानुसार तीन टप्प्यात करण्यात येणार होते. परंतु काही तांत्रिक व प्रशासकीय अडचणीमुळे दि.१०.०५.२०१६ रोजीच्या उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमध्ये शहरात बसविण्यात आलेल्या कॅमेऱ्यांच्या संख्येनुसार कामाचे टप्पे निश्चित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार पहिल्या टप्प्यामध्ये (phase-I) मध्ये ९३७ कॅमेरे कार्यान्वित (Go-Live) करणे, दुस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित करणे व तिस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित करणे आवश्यक आहे. त्यानुसार शासनाने मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा पहिला टप्पा दि. ४.६.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक २०.६.२०१६ च्या पत्रान्वये घोषित केले आहे. त्यानंतर मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचा दुसरा टप्पा दि.१९.९.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक १९.९.२०१६ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे. तसेच त्यानंतर दि.२५.०९.२०१७ रोजीच्या संदर्भाधिन क्र.७ येथील नमूद शासन निर्णयान्वये गठीत उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्यासह प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक ०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात झालेल्या करारानुसार सदर प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर भांडवली खर्चाची उर्वरित २०% रक्कम व कार्यान्वयन खर्च (OPEX) हा २० समान तिमाही हप्त्यामध्ये प्रकल्प संचालक कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. त्यानुसार मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीने संदर्भाधीन क्र.९ येथील दि.३०.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिस-या तिमाहीची (Quarter-3) देयके सादर केली असून ती अदा करण्याची विंनती केली आहे. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१० येथील दि.०७.०७.२०१८ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार सदर प्रकल्पाच्या तिस-या तिमाहीसाठी (Quarter-3) रु.२७,७१,८९,४८२/- एवढी रक्कम देय होत असून सदर रकमेमध्ये दिनांक ०४.०३.२०१८ पासून दि.०३.०६.२०१८ रोजी पर्यंत प्रकल्पाच्या किंमतीत झालेल्या वाढीनुसार प्रकल्प संचालक कंपनीस देय असलेली फरकाची रु.१,९८,८५,२१९/- एवढी रक्कम समाविष्ठ करुन प्रकल्प संचालक, मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीस रु.२९,७०,७४,७०१/- (अक्षरी रुपये एकोणतीस कोटी सत्तर लाख चौ-याहत्तर हजार सातशे एक फक्त) एवढी रक्कम देय होत आहे. सदर अहवालानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिस-या तिमाहीसाठी मे.लार्सन ॲण्ड टुब्रो कंपनी लि. या कपंनीला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात करार झालेला आहे. सदर करारानुसार सदर प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर भांडवली खर्चाची उर्वरित २०% रक्कम व कार्यान्वयन खर्च (OPEX) हा २० समान तिमाही हप्त्यामध्ये प्रकल्प संचालक कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या दुसऱ्या तिमाहीसाठी प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीस

रु.२९,७०,७४,७०१/- (अक्षरी रुपये एकोणतीस कोटी सत्तर लाख चौ-याहत्तर हजार सातशे एक फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.0521466308 (IFSC Code - CITI0000003) (MICR CODE OF THE BANK-600037002) या खात्यावर जमा करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७ ला अनुसरुन प्रशासकीय विभागाला असलेलया अधिकारान्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२,दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२४१७१९०४२८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.09.24 17:23:55 +05'30'

(कैलास गायकवाड)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव.
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, मुंबई.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०.महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३.मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१४.मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि., २५२, वीर सावरकर मार्ग, दादर (प), मुंबई-४०० ०२८.
१५.वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१६. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.
१७. रोख शाखा/ गृह विभाग, मुंबई.
१८. निवडनस्ती, पोल-३.